सेंद्रिय शेती/ विषमुक्त शेती राज्यपुरस्कृत योजनेअंतर्गत डॉ.पंजाबराव देशमुख जैविक शेती मिशन च्या अध्यक्षांची नियुक्ती रद्द करण्याबाबत.

**<u>महाराष्ट्र शासन</u>**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन शुद्धीपत्रक क्रमांक :- योजना - ३३१९/प्र.क्र.२३/१अे**

**मंत्रालय, मुंबई-४०००३२.**

**दिनांक :- २ नोव्हेंबर २०२०**

<u>वाचा</u> :- १. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक जैशिमि १०१८/प्र.क्र.१२५/१७१ अे, दि.१६/१०/२०१८.

२. शासन निर्णय, कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग क्रमांक: योजना-३३१९/प्र.क्र.२३/१- अे, दि.२८.०२.२०१९

<u>प्रस्तावना</u>:-

सेंद्रिय शेती/विषमुक्त शेती या राज्यपुरस्कृत योजनेअंतर्गत डॉ. पंजाबराव देशमुख जैविक शेती मिशन राबविण्यास संदर्भ क्र.१ वरील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. डॉ. पंजाबराव देशमुख जैविक शेती मिशनसाठी सेंद्रिय शेतीविषयक तज्ञाची अध्यक्ष म्हणून नेमणुक करण्याची तरतूद संदर्भ क्र.१ वरील शासन निर्णयामध्ये आहे. यास अनुसरून संदर्भ क्र.२ वरील शासन निर्णयान्वये डॉ. पंजाबराव देशमुख जैविक शेती मिशनकरिता अध्यक्षांची नियुक्ती करण्यात आली होती.

२. प्रत्येक प्रशासकीय विभागांतर्गत विविध कायदे/अधिनियम/नियमाद्वारे स्थापित शासकीय/अशासकीय मंडळे व समित्या यावर नियुक्त केलेल्या सदस्यांच्या नियुक्त्या रद्द करून नव्याने मंडळे व समित्या पुनर्गठित करण्याबाबत सूचना देण्यात आल्या आहेत. त्यानुसार अध्यक्ष, डॉ.पंजाबराव देशमुख जैविक शेती मिशन, अकोला यांची नियुक्ती रद्द करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

<u>शासन निर्णय</u>:-

सेंद्रिय शेती/विषमुक्त शेती या राज्यपुरस्कृत योजनेअंतर्गत डॉ.पंजाबराव देशमुख जैविक शेती मिशन, अकोला चे अध्यक्ष म्हणून वाचा क्र. ०२ येथील शासन निर्णयान्वये करण्यात आलेली श्री.प्रकाश पोहरे, अकोला यांची नियुक्ती या शासन निर्णयान्वये रद्द करण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२०११०२१२४३०८३००१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Umesh Narayan Chandiwade

Digitally signed by Umesh Narayan Chandiwade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0a3a08c7339c487fe2836238383bf91bbd037b93b4bdf6c8e95d1969e585fffe, serialNumber=ccbe80fcc6b64503b4e8b1269bd88d631f3f3c2bef6e1ca70cc9a4e30954011f, cn=Umesh Narayan Chandiwade
Date: 2020.11.02 12:46:21 +05'30'

**( उमेश चांदिवडे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (कृषि व माजी सैनिक कल्याण), मंत्रालय, मुंबई.

२. मा.राज्यमंत्री (सहकार, कृषि, सामाजिक न्याय, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण, अल्पसंख्यांक विकास व औकाफ, मराठी भाषा ), मंत्रालय, मुंबई.
३. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/ विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई.
४. प्रधान सचिव, मा.मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
५. सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. सहसचिव (कृषि), मुख्यसचिव कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
७. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८. श्री.प्रकाश पोहरे, अकोला.
९. सह सचिव (निविष्ठा व गुणनियंत्रण), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.संचालक (निविष्ठा व गुणनियंत्रण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
११.महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर .
१२.सर्व कृषि संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१३.श्री.सुभाष नागरे, प्रकल्प संचालक, पंजाबराव देशमुख जैविक शेती मिशन, अकोला तथा, विभागीय कृषि सह संचालक, अमरावती.
१४.सर्व विभागीय कृषि सहसंचालक.
१५.सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, महाराष्ट्र राज्य
१६.महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परिक्षा) मुंबई/नागपूर.
१७. संचालक, लेखा व कोषागार अधिकारी, मुंबई (२ प्रती)
१८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य
१९.अभिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२०.निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
२१.निवडनस्ती, कार्यासन १-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.